मंत्रालयीन संवर्गातील अधिकारी/कर्मचारी यांच्या प्रतिनियुक्तीबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- संकीर्ण-२०१७/प्र.क्र.१२०/कार्या-१४**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**
**दिनांक- ३१ ऑगस्ट, २०१७**

**वाचा:-** शासन निर्णय सा.प्र.वि.क्र - एसआरव्ही-२०११/प्र.क्र.१३७/कार्यासन १२, दि.१७/१२/२०१६.

**प्रस्तावना :-**

शासकीय अधिकारी/कर्मचारी यांच्या प्रतिनियुक्तीने नियुक्तीसाठी अटी व शर्ती आणि नियुक्तीची कार्यपध्दती याबाबतचे धोरण संदर्भाधीन शासन निर्णयानुसार निश्चित करण्यात आले आहे. सदर शासन निर्णयातील परिच्छेद क्रमांक-६.६ नुसार प्रतिनियुक्तीने जाणाऱ्या अधिकारी/कर्मचाऱ्यास संवर्ग नियंत्रक प्राधिकाऱ्याने आदेश काढून कार्यमुक्त करण्याची तरतूद आहे. तथापि, मंत्रालयातील अधिकारी/कर्मचाऱ्यांच्या सेवा या संबंधित विभागाच्या अधिनस्त असल्या तरी मंत्रालयातील अधिकारी/कर्मचाऱ्यांचे संवर्ग नियंत्रण हे कार्यासन-१४/१४-अ/१४-ब सामान्य प्रशासन विभाग यांचेमार्फत करण्यात येते.अशा परिस्थितीत प्रशासकीय सोयीच्या दृष्टीकोनातून मंत्रालयीन अधिकारी/कर्मचाऱ्यांच्या प्रतिनियुक्तीचे आदेश हे संवर्ग नियंत्रक १४/१४-अ/१४-ब या कार्यासनांमार्फत काढण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

प्रस्तावनेत नमूद केलेल्या सर्व बाबींचा सर्वंकष विचार करुन मंत्रालयीन अधिकारी/कर्मचाऱ्यांच्या संदर्भात प्रतिनियुक्ती बाबतची कार्यपध्दती खालीलप्रमाणे विहित करण्यात येत आहे.:-

१) ज्या विभागास/कार्यालयास प्रतिनियुक्तीसाठी मंत्रालयीन अधिकारी/कर्मचाऱ्यांची आवश्यकता असेल त्या विभाग अथवा कार्यालयाने याबाबतची मागणी कार्यासन-१४/१४-अ/१४-ब सामान्य प्रशासन विभाग यांच्याकडे पाठवावी.

२) कार्यासन-१४/१४-अ/१४-ब सामान्य प्रशासन विभाग यांनी संबंधित प्रतिनियुक्तीच्या पदांची जाहिरात शासनाच्या संकेतस्थळावर/ इंट्रानेटवर प्रसिध्द करावी.

३) या जाहिरातीस अनुसरुन मंत्रालयीन अधिकारी/कर्मचारी यांनी सबंधीत विभागामार्फत आपला अर्ज साप्रवि कार्यासन-१४/१४-अ/१४-ब सामान्य प्रशासन विभाग येथे पाठवावा.

४) कार्यासन-१४/१४-अ/१४-ब सामान्य प्रशासन विभाग यांनी सदर जाहिरातीच्या अनुषंगाने प्राप्त झालेल्या अर्जानुसार प्रतिनियुक्तीने पाठवावयाच्या उमेदवारांची निवड करण्यासाठी याबाबतचा प्रस्ताव नागरी सेवा मंडळास सादर करावा.

५) कार्यासन-१४/१४-अ/१४-ब सामान्य प्रशासन विभाग यांनी नागरी सेवा मंडळाने केलेल्या शिफारशींच्या अनुषंगाने आवश्यक असल्यास योग्य ते अभिप्राय नोंदवून याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या/सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेसाठी सादर करावा.

६) सदर प्रस्तावास शासनाची/सक्षम प्राधिकाऱ्यांची मान्यता प्राप्त झाल्यानंतर कार्यासन-१४/१४-अ/१४-ब सामान्य प्रशासन विभाग यांनी प्रतिनियुक्तीचे आदेश निर्गमित करावेत. प्रतिनियुक्तीचे आदेश निर्गमित झाल्यानंतर संबंधीत मंत्रालयीन विभागाने निवड झालेल्या अधिकारी/कर्मचाऱ्यांस कार्यमुक्त करावे.

७) मंत्रालयीन संवर्गातील प्रतिनियुक्तीवर गेलेल्या अधिकारी/कर्मचाऱ्यांचा प्रतिनियुक्ती कालावधी संपुष्टात येत असेल, अशा वेळी संवर्ग नियंत्रणाच्या दृष्टीने सदर प्रतिनियुक्तीचे पद भरण्यासाठी कार्या-१४/१४-अ/१४-ब यांनी पुरेसे अगोदर शक्यतो प्रतिनियुक्ती कालावधी संपुष्टात येण्यापुर्वी तीन महिने इच्छुकता मागविण्यासाठी जाहिरात प्रसिध्द करावी.

८) संदर्भाधीन शासन निर्णय, दिनांक १७.१२.२०१६ मधील नमूद प्रतिनियुक्ती संदर्भातील इतर अटी व शर्ती हया कायम राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०८३११५०३१२२६०७ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Imtiyaz Mushtaque Kazi

Digitally signed by Imtiyaz Mushtaque Kazi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=711589caceff9b0bb07e3c6556e724501d0c5ea5c63b3146314d51ec0e87d0a6, cn=Imtiyaz Mushtaque Kazi
Date: 2017.08.31 19:15:53 +05'30'

**( इ.मु.काझी )**
**शासनाचे सह सचिव**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई,
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,
३. सर्व मा.मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
४. मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/ विधानसभा, विधानभवन, मुंबई,
५. सर्व मा.संसद सदस्य,/मा.विधानमंडळ सदस्य, महाराष्ट्र राज्य,
६. मुख्य सचिव,महाराष्ट्र शासन
७. सर्व मंत्रालयीन विभागांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
८. सर्व मंत्रालयीन विभाग (आस्थापना), त्यांनी हे आदेश सर्व संबंधितांच्या निदर्शनास आणावेत.
९. *प्रबंधक, मूळ शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
१०. *प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
११. *प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
१२. *सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई.